**एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मधील विविध योजनेतील लाभार्थ्यांना अनुदान/अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी व नोंदणी शुल्क जमा करण्यासाठी बँकेत दोन चालू खाते उघडण्यास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. सपववि-३७०१२/१५/२०२४-DESKTEX-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- ११ जुलै, २०२४.

**वाचा :** १) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. धोरण २०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५ दिनांक ०२ जून २०२३.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.८८/२३/कोषा-प्रशा५ दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१२३/२२/कोषा-प्रशा५ दिनांक २२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्याचे नवीन एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ दि. ०२ जून २०२३ रोजी जाहीर करण्यात आले आहे. त्याअंतर्गत विभागाच्या विविध योजना राबविताना करण्यात येणाऱ्या सर्व कार्यवाहीकरीता ऑनलाईन प्रणाली विकसित करण्याचे प्रस्तावित आहे. सदर प्रणालीद्वारे वस्त्रोद्योग विभागातील विविध योजनांमधील लाभार्थ्यांचे प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून त्यांना अनुदान/ अर्थसहाय्य वितरीत करण्यापर्यंतची सर्व कार्यवाही सदर प्रणालीमार्फत करण्याचे प्रस्तावित आहे. त्यानुसार एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मधील सर्व योजनांचे end to end Process Automation करण्यासाठी ई-टेक्स्टाइल (e-Textile) प्रणाली विकसित करण्यात येणार असून सदर प्रणाली विकसित करताना प्रणालीची रचना, विकास, अंमलबजावणी आणि देखभाल यासाठी आयसीआयसीआय बँकेची निवड करण्यात आली आहे. आयसीआयसीआय बँक ई-टेक्स्टाइल प्रणाली विकसित करताना विभागाकडून कोणताही मोबदला आकारणार नाही. तसेच कोणतेही प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष खर्च विभागावर आकारणार नाही. वस्त्रोद्योग विभागासाठीची ई-टेक्स्टाइल प्रणाली विकसित करण्याबाबत आयसीआयसीआय बँकेसोबत सामजस्य करार (MOU) करण्यात आला आहे. वस्त्रोद्योग विभागासाठी ई-टेक्स्टाइल प्रणाली विकसित करताना वस्त्रोद्योग घटकांकडून नोंदणी शुल्क जमा करण्यासाठी तसेच विविध योजनेतील लाभार्थ्यांना अनुदान/अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी आयसीआयसीआय बँकेत वस्त्रोद्योग विभागातील उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या पदनावे दोन चालू खाते उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण २०२३-२८ मध्ये जाहीर केल्यानुसार वस्त्रोद्योग विभागाच्या विविध योजनांमधील लाभार्थ्यांचे प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून त्यांना अनुदान/ अर्थसहाय्य वितरीत करण्यापर्यंतच्या कामकाजाचे end to end Process Automation करण्यासाठी ई-टेक्स्टाइल प्रणाली

आयसीआयसीआय बँकेमार्फत विकसित करण्याची कार्यवाही सुरु आहे. सदर प्रणाली विकसित झाल्यानंतर वस्त्रोद्योग घटकांकडून नोंदणी शुल्क जमा करण्यासाठी तसेच विविध योजनेतील लाभार्थ्यांना अनुदान/अर्थसहाय्य वितरीत करण्यासाठी आयसीआयसीआय बँकेत वस्त्रोद्योग विभागातील उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या पदनावे दोन चालू खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

१. आयसीआयसीआय बँकेच्या एका चालू खात्याचे नाव Deputy Secretary Textile Department registration fee account असे नमूद करण्यात यावे. सदर खात्यामध्ये वस्त्रोद्योग घटकांकडून नोंदणी शुल्क जमा करण्यात येईल. सदर रक्कम नंतर शासनाच्या खाती जमा करावी.
२. आयसीआयसीआय बँकेच्या दुसऱ्या चालू खात्याचे नाव Deputy Secretary Textile Department fund disbursement account असे नमूद करण्यात यावे. सदर खात्यामधून वस्त्रोद्योग विभागातील विविध योजनेतील लाभार्थांना अनुदान/ अर्थसहाय्य वितरीत करण्यात येईल.
३. उपरोक्त दोन्ही खात्यासाठी अधिकृत स्वाक्षरीकर्ता (Authorised signatory) म्हणून उप सचिव (वस्त्रोद्योग) हे राहतील.
४. आयसीआयसीआय बँकेने प्रदानाची जबाबदारी Transaction + १ day या कालमर्यादेत व प्रदानाचे प्रक्रियेत चूक झाल्यामुळे झालेले परतावे (Refund) सुध्दा Transaction + १ day कालावधीत पुर्ण करणे आवश्यक आहे.
५. सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक / तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण करणे अनिवार्य राहील.
६. वित्तीय औचित्याच्या सत्राचे पालन करण्यात यावे.
७. सदर बँक खाते बंद करण्यात आल्यास, त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली सहसचिव/उपसचिव, वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी तात्काळ जमा करावी.
८. आयसीआयसीआय बँकेला सदर खात्यातील सर्व सेवांसाठी / व्यवहारांसाठी कोणतेही शुल्क आकारता येणार नाही.
९. प्रस्तुत प्रकरणी शासनाने वेळोवेळी दिलेले निर्देश आयसीआयसीआय बँकेवर बंधनकारक राहतील.
१०. सामंजस्य करारानुसार अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात येईल.
११. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३ मधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन करण्यात यावे.

२. वस्त्रोद्योग विभागातील उप सचिव (वस्त्रोद्योग) यांचे पदनावे आयसीआयसीआय बँकेमध्ये दोन चालू खाते उघडण्याची कार्यवाही तात्काळ करावी. सदर दोन खात्यांपैकी ज्या चालू खात्यामधून वस्त्रोद्योग विभागातील विविध योजनेतील लाभार्थांना अनुदान/ अर्थसहाय्य वितरीत करण्यात येणार आहे ते खाते विभागाच्या प्रस्तावीत आभासी वैयक्तिक ठेव लेख्यास दुय्यम म्हणून उघडण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसंक्र ४७/२०२४ को.प्र.५ दिनांक २७/०२/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१११२१०१३३००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2024.07.11 12:21:30 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय) महाराष्ट्र राज्य याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. सर्व मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
८. मा. खासदार (सर्व), महाराष्ट्र राज्य.
९. मा. आमदार (सर्व), महाराष्ट्र राज्य.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
११. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
१३. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ, नवी मुंबई
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२,मुंबई,नागपूर.
१७. प्रादेशिक उपायुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर/औरंगाबाद/नागपूर/मुंबई.
१८. मुख्य व्यवस्थापक, आयसीआयसीआय बँक, मुंबई.
१९. वित्त विभाग (कोषा प्रशा-५), मंत्रालय, मुंबई
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. कक्ष अधिकारी (टेक्स १ (अ)/टेक्स १(ब)/टेक्स ३/टेक्स ४/टेक्स ५/रेशीम कक्ष)
२२. कक्ष अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई
**२४.** निवडनस्ती (टेक्स २).